**महाराष्ट्र साक्षीदार संरक्षण आणि सुरक्षा कायदा, २०१७ मधील कलम ३ अन्वये राज्य / जिल्हा साक्षीदार संरक्षण समिती स्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्र. बीएनएसएस-०३२५/प्र.क्र.२७/विशा-९**
दुसरा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-३२.
दिनांक : १५ एप्रिल, २०२५.

**संदर्भ :** १) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे दिनांक २६/०३/२०२५ रोजीचे पत्र

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन पत्रान्वये पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी महाराष्ट्र साक्षीदार संरक्षण आणि सुरक्षा कायदा २०१७ मधील कलम ३ अन्वये राज्य साक्षीदार संरक्षण समिती, जिल्हा साक्षीदार संरक्षण समिती, महानगर क्षेत्र साक्षीदार संरक्षण समिती, आयुक्तालय साक्षीदार संरक्षण क्षेत्र (महानगर क्षेत्र वगळून) व इतर क्षेत्रासाठी साक्षीदार संरक्षण समिती स्थापन करण्यासाठी शासनास केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने उक्त समित्या स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश:-**

नवीन फौजदारी कायदयाच्या प्रभावी अंमलबजावणी करण्याकरीता तसेच फौजदारी खटल्यात साक्षीदारांना व त्यांच्या नातेवाईकांना गंभीर गुन्हयाच्या संबंधात आणि त्यांच्याशी संबंधित अनुषंगिक बाबीसाठी महाराष्ट्र साक्षीदार संरक्षण व सुरक्षा कायदा २०१७ द्वारे साक्षीदारास संरक्षण पुरवले जाते.

साक्षीदार संरक्षण व सुरक्षा कायदा २०१७ मधील कलम ३ नुसार खालीलप्रमाणे समित्या या आदेशान्वये गठित करण्यात येत आहेत. क्षेत्रनिहाय त्या समित्यांची रचना खालीलप्रमाणे असेल.

### अ) राज्यस्तरीय साक्षीदार संरक्षण समिती

महाराष्ट्र साक्षीदार संरक्षण कायदा-२०१७ मधील कलम ३(१)(a) व ३(२) नुसार खालीलप्रमाणे राज्य साक्षीदार समिती गठीत करण्यात येत आहे.

| राज्यस्तरीय साक्षीदार संरक्षण समिती | | |
|---|---|---|
| १ | आयुक्त, राज्य गुप्तचर विभाग, महाराष्ट्र राज्य,मुंबई | अध्यक्ष |
| २ | विशेष पोलीस महानिरीक्षक (कायदा व सुव्यवस्था) महाराष्ट्र राज्य, मुंबई. | सदस्य |
| ३ | सहसचिव /उपसचिव विशा-०९ | सदस्य |
| ४ | सहायक पोलीस महानिरीक्षक (कायदा व सुव्यवस्था) महाराष्ट्र राज्य, मुंबई. | सदस्य सचिव |

**ब) जिल्हास्तरीय साक्षीदार संरक्षण समिती**

महाराष्ट्र साक्षीदार संरक्षण कायदा-२०१७ मधील कलम ३(१)(b) व ३(३)(a)(b) नुसार संबधीत कार्यक्षेत्राकरीता खालीलप्रमाणे साक्षीदार समित्या गठीत करण्यात येत आहेत.

a) महानगर व पोलीस आयुक्तालय क्षेत्राकरीता साक्षीदार संरक्षण समिती (कलम ३(३) (a)&(b) नुसार)

| **महानगर व पोलीस आयुक्तालय क्षेत्राकरीता साक्षीदार संरक्षण समिती** | | |
|---|---|---|
| १ | पोलीस आयुक्त | अध्यक्ष |
| २. | आयुक्त, महानगरपालिका | सदस्य |
| ३ | पोलीस आयुक्त यांनी नामनिर्देशित केलेले दोन पोलीस उपायुक्त किंवा त्यापेक्षा वरिष्ठ दर्जाचे अधिकारी | सदस्य |
| ४. | जिल्हा सरकारी वकील | सदस्य |
| ५. | सहायक पोलीस आयुक्त (मुख्यालय) | सदस्य सचिव |

b) इतर क्षेत्राकरीता (आयुक्तालय क्षेत्र वगळून) साक्षीदार संरक्षण समिती(कलम ३(३)c नुसार)

| **इतर क्षेत्राकरीता साक्षीदार संरक्षण समिती** | | |
|---|---|---|
| १ | जिल्हा दंडाधिकारी | अध्यक्ष |
| २ | पोलीस अधिक्षक | सदस्य |
| ३ | जिल्हा सरकारी वकील | सदस्य |
| ४ | पोलीस उपअधिक्षक (मुख्यालय) | सदस्य सचिव |

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४१५१७१४३७९२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK SHIVAJI NAIKWADE

Digitally signed by ASHOK SHIVAJI NAIKWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=1ab0baa8d0f5eb5c2f100c748bf97b95cbab1ae440851ad48198d8c8e1f05247, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=289064309A4417DCF339786241D3052E5DDBD6F07628BE5505318B15872CBCDC, cn=ASHOK SHIVAJI NAIKWADE
Date: 2025.04.15 17:15:37 +05'30'

**(अशोक नाईकवाडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव (अपिल व सुरक्षा) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) प्र.स. (विशेष) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) रजिस्ट्रार जर्नल, मा. उच्च न्यायालय, मुंबई.
६) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) सर्व जिल्हाधिकारी
८) सर्व आयुक्त, महानगरपालिका
९) सर्व पोलीस आयुक्त व पोलीस अधिक्षक.
१०) निवड नस्ती (विशा.९)